**डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठाचे विभागीय केंद्रे व उपकेंद्रांसाठी जागा उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.1163967-HTED-11011/29/2025-MHT(TE-2)**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १८ जून २०२५.

**संदर्भ :-**

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक:-HTED-११०३०(११)/१/२०१३-MHT-(TE-२), दि.३१.०१.२०१४
२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ९(३)/ नियोजन/ DBATU/जागा/२०२५/१८७, दिनांक १०.०६.२०२५.

**प्रस्तावना :-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपुर्ण महाराष्ट्रभर निर्धारीत करण्यात आलेले असुन, सदर विद्यापीठाचे मुख्य केंद्र लोणेरे, ता. माणगाव, जिल्हा रायगड येथे कार्यरत ठेवून मुंबई, पुणे, औरंगाबाद व नागपुर येथे विद्यापीठाचे विभागीय केंद्रे तसेच अमरावती, जळगांव, कोल्हापुर, नांदेड व सोलापूर येथे विद्यापीठाचे उपकेंद्रे स्थापन करण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे.

सदर विभागीय केंद्रे व उपकेंद्रे स्थापन करण्याकरिता आवश्यक जागा संबंधित ठिकाणी कार्यरत पारंपारिक अकृषी विद्यापीठांनी त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या जमिनीतून प्रत्येकी ५ एकर जमीन, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठास उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि. १०.०६.२०२५ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार संबंधित अकृषी विद्यापीठांना निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठाचे विभागीय केंद्रे व उपकेंद्रासाठी जागा उपलब्ध करुन देण्याबाबत Maharashtra Public Universities Act, २०१६ च्या Chapter- II मधील कलम-५ मधील क्र. ८१ येथील तरतुदीनुसार पारंपारिक विद्यापीठांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

I. डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठाचे विभागीय केंद्रे तसेच उपकेंद्रे स्थापन करण्याकरिता संबंधित अकृषी विद्यापीठाने विनामुल्य अथवा रु.१/- नाममात्र दराने किमान १ एकर किंवा उपलब्धतेनुसार त्यापेक्षा जास्त जागा, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठास हस्तांतरीत करण्यात यावी.

II. प्रस्तावित उपकेंद्रासाठीची जागा ही विद्यापींठाच्या मुख्यालयाच्या मुख्य इमारतीच्या अथवा मुख्य आवारामध्ये (मेन कॅम्पस) उपलब्ध करुन देण्यात यावी.

III. ज्या अकृषी विद्यापीठांकडे बांधकाम केलेली जागा उपलब्ध असेल, त्यांनी सदर जागा नाममात्र दराने डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठास उपलब्ध करुन द्यावी. मात्र, यासाठी येणारा खर्च (मालमत्ता कर, पाणीपट्टी, वीज देयक, देखभाल व दुरुस्ती खर्च व इतर अनुषंगिक बाबींवरील खर्च) हा डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे यांनी करावा.

IV. सदरहु प्रकरणी दि. ३१.०७.२०२५ पर्यंत आवश्यक ती सर्व कार्यवाही करुन त्याबाबतचा कार्यपुर्ती अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१८१२१८४२३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने, शासन मान्यता देण्यात येत आहे.

SANTOSH PUNAMCHAND KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2025.06.18 12:20:09 +05'30'

**(संतोष खोरगडे)**

**सहसचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२. मा. मंत्री, मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे प्रधान सचिव,

३. प्रधान सचिव, मा. मुख्य मंत्री यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई

४. प्रधान सचिव, मा. उप मुख्य मंत्री यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई

५. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई.

७. अध्यक्ष, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली

८. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे

९. अध्यक्ष, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परीषद, नवी दिल्ली

१०. अध्यक्ष, भारतीय औषध निर्माणशास्त्र परिषद, नवी दिल्ली

११. कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे

१२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, अमरावती, नाशिक

१४.कुलगुरु, रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई.

१५.संचालक, अभियांत्रीकी महाविद्यालय, पुणे.

१६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रीकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर

१७.प्राचार्य, शासकीय अभियांत्रीकी महाविद्यालय, अमरावती

१८.प्राचार्य, शासकीय अभियांत्रीकी महाविद्यालय, कराड

१९. प्राचार्य, शासकीय अभियांत्रीकी महाविद्यालय, जळगाव

२०.प्राचार्य, शासकीय अभियांत्रीकी महाविद्यालय, चंद्रपूर

२१. संचालक, वीर माता जिजाबाई टेक्नीकल इन्स्टिटयूट, माटुंगा, मुंबई.

२२.संचालक, श्री गुरु गोविंद सिंग अभियांत्रिकी महाविद्यालय, नांदेड.

२३.नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.

२४. वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.

२५.उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने

२६.निवड नस्ती तांशि-२